**जलसंपदा विभागाच्या दृकश्राव्य यंत्रणेच्या (Video Conferencing (VC) प्रभावी वापराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २०१३/(०१/२०१३)/सं.क.**

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक: १६ /१०/२०१४

**प्रास्ताविक :**

जलसंपदा विभागातील महामंडळे, महासंचालक, प्रादेशिक विभाग, मंडळ व विभागीय कार्यालये या क्षेत्रीयस्तरावरील सर्व कार्यालयांमध्ये अंदाजे ५०० पेक्षा जास्त वरिष्ठस्तरावरील अधिकारी कार्यरत आहेत. विभागातील कामे पार पाडण्यासाठी वेळोवेळी अधिकाऱ्यांना बैठका, चर्चा, शासकीय व्याखाने व अल्प कालावधीचे प्रशिक्षण यासाठी विविध ठिकाणी प्रवास करून उपस्थित रहावे लागते. काही वेळा प्रवासासाठी आरक्षण मिळणे शक्य होत नाही व अशा प्रकारच्या धावपळीमुळे विभागातील अधिकाऱ्यांच्या स्वास्थ्यावर परीणाम होऊन त्यांची कार्यक्षमता कमी होत असल्याचे दिसुन आले आहे. मुख्य अभियंता यांच्या परीषदेमध्ये विविध कार्यालयामध्ये आयोजित केलेल्या बैठकांमुळे कार्यालयीन कामकाजावर तसेच प्रकल्प बांधकामांवर कार्यक्षमपणे नियंत्रण ठेवणे शक्य होत नाही, असे मत व्यक्त करण्यात आले होते.

या अनुषंगाने जलसंपदा विभागांतर्गत असलेल्या राज्यभरातील सर्व जिल्हा मुख्यालयाच्या ठिकाणी किमान एका कार्यालयामध्ये दृकश्राव्य यंत्रणा (VC) उपलब्ध करुन देण्यात आली आहे. या यंत्रणेमार्फत विविध अधिकाऱ्यांच्या बैठका आयोजित करून त्या-त्या जिल्हातून संपर्क साधणे शक्य होणार आहे.१० वरीष्ठ कार्यालयामध्ये Multi-party व १८ जिल्हा मुख्यालयात Two-party यंत्रणा उपलब्ध आहे. एकावेळेस उपरोक्त कोणत्याही १० Multi-party यंत्रणेशी कोणत्याही ७ Multi-party / Two-party यंत्रणा जोडता येईल, अशाप्रकारे एका वेळी कमाल ८ कार्यालयांना जोडणे शक्य होणार आहे.

विभागातील सर्व अधिकारी यांनी VC वापरल्यास, त्यांना मुख्यालयात थांबणे शक्य होईल, त्यामुळे कार्यालयीन व क्षेत्रीय कामांवर कार्यक्षमपणे नियंत्रण ठेवणे शक्य होईल. तसेच वेळ व पैसा खर्ची पडणार नाही. या अनुषंगाने VC च्या कार्यक्षम वापराबाबत अधिकाऱ्यांना सूचना देण्याचा निर्णय शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

१) जलसंपदा विभागातील VC यंत्रणेचा प्रभावीपणे वापर करुन कार्यक्षमता वाढविण्यासाठी सर्व स्तरावर आयोजित करण्यात येणाऱ्या बैठका या यंत्रणेद्वारे घेणे बंधनकारक राहील. अपवादात्मक परिस्थितीमध्ये, प्रत्यक्ष उपस्थित राहुन बैठका आयोजित करायची झाल्यास, त्यासाठीची कारणे नोंदवुन अशा बैठका बोलाविण्यात याव्यात.

२) मंत्रालयातुन काही वेळा चर्चेसाठी क्षेत्रीय अधिकाऱ्यांना बोलावण्यात येते, त्याऐवजी आता VC यंत्रणेच्या माध्यमातुन त्यांचेसोबत चर्चा करण्यात यावी. प्रधान सचिव / मुख्य अभियंता व सह सचिव यांच्या मान्यतेशिवाय क्षेत्रीय अधिकाऱ्यास चर्चेला / बैठकीला बोलविण्यात येऊ नये.

३) जिल्हा मुख्यालयी उपलब्ध करुन देण्यात आलेली VC यंत्रणा ही त्या जिल्ह्यातील जलसंपदा विभागाच्या सर्व अधिकाऱ्यांसाठी वापरण्यास उपलब्ध करुन देण्यात यावी.

४) सदर यंत्रणा २४x७ अखंडित कार्यान्वित राहील यासाठी संबंधित कार्यालय प्रमुखाने सुयोग्य अधिकाऱ्याची "समन्वयक अधिकारी" म्हणून नेमणूक करावी. तसेच त्यांना सहाय करण्यासाठी सुयोग्य कर्मचाऱ्यांची नेमणूक करावी. त्यांनी यंत्रणेचे सखोल ज्ञान उपलब्ध करुन घ्यावे. समन्वय अधिकारी व सहायक कर्मचारी यांची नांवे, दूरध्वनी क्रमांक, भ्रमणध्वनी क्रमांक, ईमेल पत्ता तसेच दृकश्राव्य यंत्रणेसाठीचा IP Address हे अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे यांना एक आठवड्याच्या आत पाठवावे. त्याची एकत्रित यादी अधीक्षक अभियंता, कोयना संकल्पचित्र मंडळ, पुणे यांनी तयार करून मंत्रालयास तसेच सर्व क्षेत्रीय कार्यालयांना पाठवावी.

५) या प्रणालीमुळे कोणतीही बैठक पुर्वसुचनेशिवाय देखील आयोजित करण्यात येईल. त्यामुळे कोणतीही तांत्रिक अथवा प्रशासकीय अडचण निर्माण होऊ नये यासाठी आवश्यक ती काळजी समन्वयक अधिकारी यांनी घ्यावी.

६) वाल्मी व मेटा या प्रशिक्षण संस्थेमार्फत घेण्यात येणाऱ्या प्रशिक्षण वर्गांना मार्गदर्शन करण्यासाठी अनुभवी वरीष्ठ अधिकारी / इतर संस्थेतील व्यक्ती आदी व्याख्याते म्हणुन उपलब्ध व्हावेत यासाठी विभागाच्या सर्व कार्यालयातील VC यंत्रणेचा वापर यासाठी अनिवार्य राहील.

७) संबंधीत VC यंत्रणा असलेल्या समन्वय अधिकारी यांनी बैठका, चर्चा, शासकीय व्याखाने व अल्प प्रशिक्षणाची नोंद नोंदवहीमध्ये ठेवावी, नमुना खालीलप्रमाणे-

| अ. क्र. | VC यंत्रणेव्दारे बैठक/चर्चा/ प्रशिक्षण/व्याखान | VC यंत्रणा वापराचा विषय | दिनांक | VC कोणाच्या अध्यक्षेखाली (पदनाम व कार्यालयाचा पत्ता) | VC कोणासोबत (पदनाम व कार्यालयाचा पत्ता) |
|---|---|---|---|---|---|
| | २ | ३ | ४ | ५ | ६ |

८) सदर यंत्रणेमार्फत एका वेळी कमाल ८ VC यंत्रणा स्थापित कार्यालयांना जोडणे शक्य होणार असल्याने कोणत्याही बैठका आयोजित करताना हे विचारात घ्यावे. तसेच सदर बैठका आयोजित करतांना सोबत जोडलेल्या प्रपत्रातील स्थळांचा विचार करुन बैठका आयोजित करावी.

९) या VC यंत्रणेचे राज्याचे नियंत्रक अधिकारी हे कार्यकारी अभियंता, कोयना संकल्पचित्र विभाग क्र.४ पुणे हे राहतील. या यंत्रणेच्या परीरक्षण व सुयोग्य वापरासाठीच्या सूचना माहिती पुस्तिकेच्या माध्यमातुन निर्गमित करण्याचे काम संबंधीत कार्यालयामार्फत करण्यात येईल, त्याप्रमाणे VC यंत्रणेची आवश्यक ती काळजी घेण्यात यावी.

१० सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१६१७२८५२६४२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2014.10.16 17:41:18 +05'30'

**( डॉ. संजय बेलसरे )**

अधिक्षक अभियंता व पदसिध्द उप सचिव (लपा)

प्रत : माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी

१. सर्व अधिकारी व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ, पुणे,
३. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
४. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,

५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,

६. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे,

७. महासंचालक, मेरी, नाशिक,

८. महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद,

९. सर्व मुख्य अभियंता / मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, जलसंपदा विभाग,

१०.सर्व अधिक्षक अभियंता / अधीक्षक अभियंता व प्रशासक, जलसंपदा विभाग,

सर्व अधीक्षक अभियंता आणि अधीक्षक अभियंता व प्रशासक यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त आदेश त्यांचे अधिपत्याखालील कार्यालयांच्या निदर्शनास आणावेत.

११. संगणक कार्यक्रम कक्ष, ( संग्रहार्थ ).




For example :

1) Mantralaya can directly contact to all MCUs (A to I) or vice versa by using dial up
2) At second level, For eg- SE,SKIPC,ORAS can directly contact SE,KIC,RATNAGIRI who are under one MCU
3) If SE,SKIPC,ORAS, SE,KIC,RATNAGIRI wants to contact SE,OIC,OSMANABAD,they have to contact through their MCU D and E